राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (NRDWP) सौर ऊर्जा पंपाचा वापर करून विंधन विहीरीवर लघु नळ पाणी पुरवठा योजना राज्यात राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांकः ग्रापापु-५३१०/प्र.क्र.२१७/पापु-१५**

गो.ते.रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१
तारीख: २४ जुलै, २०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.२१७/पापु-१५, दिनांक २९ डिसेंबर,२०११**
२) **शासन शुध्दिपत्रक पा.पु.व स्व.वि. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.२१७/पापु-१५, दिनांक २९/८/२०१२**

**शासन शुध्दिपत्रक:-**

केंद्र शासनाच्या नवीन आणि नवीकरणीय उर्जा मंत्रालयामार्फत वर्ष २०१४-१५ मध्ये पिण्याच्या पाण्याच्या व्यवस्थेकरीता आवश्यक सोलार फोटोव्होल्टीक वॉटर पंपींग सिस्टीमचे तांत्रिक विनिर्देश सुधारीत केले आहेत. त्यानुसार केंद्र शासनाने देशात सौर उर्जेवर आधारीत पाणी पुरवठा योजना राबविण्याबाबत सुचना निर्गमीत केल्या आहेत.

संदर्भाधिन शासन निर्णयामधील परिशिष्ट क्र. ३ योजनेतील साहित्य सामुग्रीचे तांत्रिक विनिर्देश व तपशिल सुधारीत करणे आवश्यक असल्याने दि. २९/१२/२०११ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ठ क्र. ३ रद्द करण्यात येत असून सुधारीत परिशिष्ट क्र. ३ खालीलप्रमाणे वाचण्यात यावे व यापूढे त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

**परिशिष्ट क्रमांक ३**
**योजनेतील साहित्य सामुग्रीचे तांत्रिक विनिर्देश व तपशिल**

१. सौर उर्जेवरील पंप व्यवस्था -

केंद्र शासनाच्या नवीन आणि नवीकरणीय उर्जा मंत्रालयामार्फत वर्ष २०१४-१५ मध्ये पिण्याच्या पाण्याच्या व्यवस्थेकरीता आवश्यक सोलार फोटोव्होल्टीक वॉटर पंपींग सिस्टीमचे तांत्रिक विनिर्देशांनुसार -

- सोलार पॅनेल (PV Array) - ९०० Wp
- मोटर पंप संच - १ अश्वशक्ती सबमर्सिबल ब्रशलेस डी.सी. पंप (B.L.D.C.)
  किंवा
  ए. सी. (A.C.) पंप इलेक्ट्रॉनिक कंट्रोलर/ इनव्हर्टर सह.

- कमाल शटऑफ हेड - १२० मीटर
- मोडयूल माऊंटींग स्ट्रक्चर - एम. एस. हॉट डीप गॅल्व्हनाईज्ड, तीन वेळेच्या मॅन्युअल ट्रकींग च्या व्यवस्थेसह .
- उत्सर्ग - ५,००० लीटर्स प्रती दिवस (एल. पी. डी.) ९० मीटर डायनॅमीक हेडसाठी
- २५ मी. मी. व्यासाचा एच.डी.पी.ई. रायझर पाईप. - IS : ४९८४ मार्क असलेले.
- २.५ मी. मी.२ सबमर्सिबल केबल. फ्लॅट - थ्री कोर. IS : ६९४ मार्क असलेले.
- कंट्रोल पॅनेल ज्या मधे ड्राय रन प्रोटेक्शन आवश्यक व ओव्हरफ्लो प्रोटेक्शन फ्लोट स्विच साठी सुविधा असावी.
- रेन प्रिव्हेन्टीव्ह बॉक्स आवश्यक उभारणी साहित्यासह.
- सौर उर्जेवरील पंपाची व हातपंपाची विंधणविहिरीत स्वतंत्र उभारणी करणे.
- हातपंपाच्या सिलेंडरच्या खाली सौर उर्जेवरील पंप जोडणेत येऊ नये.
- स्पेशल वॉटर चेंबर व स्टेनलेस स्टीलचे बॉटम निप्पल बसविणे.
- सौर पॅनल्स सुरक्षित ठेवण्यासाठी ३ मीटर उंचीवर उभारणी.
- सौर पंपाच्या पॅनेलच्या भोवती तारेचे/भिंतीचे कुंपण.

२. ५००० लिटर्स क्षमतेची एच.डी.पी.ई.टाकी आय एस - १२७०१ मार्क असलेली.

३. ५००० लिटर्स क्षमतेच्या एच.डी.पी.ई.टाकी साठी ३ मीटर उंचीचा मनोरा.

४. उर्ध्वरण नलिका व वितरण व्यवस्था.

५. स्थानिक भौगोलीक परिस्थिती नुसार व आवश्यकतेनुसार पावसाच्या पाण्याचे विंधण विहिरीत पूर्नभरण व्यवस्था.

सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१२०५२८२३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.07.24 16:14:23 +05'30'

**(प्रमोद गि. कानडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, सर्व

२. जिल्हाधिकारी (सर्व)

३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५. अतिरिक्त संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६. सह संचालक (अभि.) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
७. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
८. मुख्य खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे / नागपूर
९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
१०.वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
११.उप अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परिषद सर्व.
१२.सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
१४.निवड नस्ती पापु-१५